# कलिका.

( कवितासंग्रह )



रामचंद्र म्हाळसाकांत वाघमारे, बी. ए. ( ऑनर्स् )

नारायण बापुराव पुराणिक, बी. ए. ( ऑनर्स् )

बाळकृष्ण देवराव जोशी, बी. ए.

—:o:—

प्रकाशक,

विठ्ठलराव मल्हारराव गायकवाड,

ज्युबिली गार्डन्, बडोदें.



१९३३

किंमत ६ आणे.

# कलिका.

( कवितासंग्रह )



रामचंद्र म्हाळसाकांत वाघमारे, बी. ए. ( ऑनर्स् ).
नारायण बापुराव पुराणिक, बी. ए. ( ऑनर्स् ).
बाळकृष्ण देवराव जोशी, बी. ए.

—:o:—

प्रकाशक,

विठ्ठलराव मल्हारराव गायकवाड,

ज्युबिली गार्डन्, बडोदें.



हें पुस्तक बडोदें येथें "**श्रीरामविजय**" छापखान्यांत रा. **धोंडो नारायण विद्वांस**, यांनीं छापिलें व विठ्ठलराव मल्हारराव गायकवाड, यांनीं येथेंच प्रसिद्ध केलें. १७–६–३३

# अनुक्रमाणिका.



## वि. वि. जोशी, एम्. ए.:—



## रा. म्हा. वाघमारे:—



## ना. बा. पुराणिक:—

**वा. दे. जोशीः—**





# प्रस्तावना.



रा. वाघमारे, रा. पुराणिक आणि रा. जोशी या विशीपंचविशींत असणाऱ्या तीन कविमित्रांनीं लिहिलेला हा चिमुकला काव्यसंग्रह वाचकवर्गास सादर करतांना मला फार आनंद वाटत आहे. या कवितांत कवींच्या प्रतिभेची कलिकावस्था दिसून येत असली तरी या मुग्ध किंवा अर्धोन्मीलित कलिकेच्या रंगावासावरून भावी पुष्पाच्या रूपगंधाविषयीं मन आशायुक्त झाल्याशिवाय रहात नाहीं. या तीनहि गुर्जरप्रांतस्थ मराठी कवींच्या भाषेंत व कित्येक स्थळीं विषययोजनेंतहि प्रादेशिक वैशिष्ट्य प्रतीतीस येतें, आणि या गुजराती पद्धतीच्या लेण्यांनीं मराठी काव्यसुंदरी क्षणभर नटलेली पाहून रसिकास वैचित्र्यजन्य आनंद खास होईल.

रा. वाघमारे यांच्या नांवावरून त्यांची कविता वीररसानें ओथंबलेली असेल असें वाटण्याचा संभव आहे, परंतु त्यांचें काव्य त्यांच्या कुलनामाशीं पूर्ण विसंवादी आहे. '**चांदणी**' या त्यांच्या कवितेंत उत्प्रेक्षा व तत्सम

अलंकारांनीं चांदणीच्या पवित्र, लोल व अस्फुट सौंदर्याचें चटकदार वर्णन आहे. पवित्र वस्तूचें स्वरूप सज्जन व दुर्जन यांस कसें भिन्न वाटतें हें त्यांनीं कवितेच्या शेवटीं सांगितलें आहे. 'पाऊस' हीहि कविता वर्णनात्मक आहे.

'माझी छत्री' आणि 'सिगारीची तलफ' या दोन कविता विनोदी आहेत. पैकीं पहिली विडंबनात्मक आहे. फाटक्या छत्रीच्या मालकाचें या कवितेंत जितकें विडंबन झालें आहे, तितकें विडंबनविषयभूत कवितेचें झालेलें नाहीं. 'सिगारीची तलफ' हा कुणबाऊ भाषेंत लिहिण्याचा प्रयत्न आहे. 'आंधळी कोशिंबीर' ही विनोदी कविता दिक्षित, 'संराक' वगैरे कवींच्या व्याज–भावगीत पद्धतीवर आहे. नायकास नायिकेच्या पितृगृहास कसें आंचवावें लागलें त्याचें वर्णन हास्यकारक आहे.

दंवबिंदुमौक्तिकांनीं भूषलेली, तारुण्यमदानें झुलणारी' कौमार्यावस्थेची पूर्ती असणाऱ्या कळीपुढें उन्मत्त भृंगांचा होणारा थयथयाट पाहून त्या दुष्टांपासून तिचें शील रक्षण्याकरितां आलेल्या बालिकेचा उपकार कविहृदयासंच काय पण कोणत्याहि सुजनाच्या हृदयास हालविणारा

आहे या कवितेचें ' दैवदुर्विपाक ' हें नांव व्याजोक्तियुक्त आहे. ' फूल व फूलपांखरूं ' या कवितेचेंहि रहस्य ' दैवदुर्विपाकां ' तल्याप्रमाणेंच आहे; परंतु उत्तरोक्त कवितेंतील कळी रक्षित आहे व पूर्वोक्तेंतील फुलें रक्षकाभावीं भ्रष्ट झालेलीं आहेत असा त्यांत फरक आहे.

' पायदळीं पडलेल्या बकुलपुष्पास ' या कवितेंत नाश पावल्यावरहि आपला सुगंध कायम ठेविणाऱ्या बकुल पुष्पाची सुकतांच गंधहीन होणाऱ्या कंटकयुक्त गुलाबाशीं तुलना केली आहे. उपरिनिर्दिष्ट तिन्ही कविता अन्योक्तिमय आहेत.

' सादास पडसाद ' या कवितेंत वर्डस्वर्थ, ब्राउनिंग प्रभृति व्हिक्टोरियाकालीन कवींचें प्रतियोगाचें तत्त्वज्ञान निर्देशिलें आहे. अनुभावक नसल्यास सौंदर्यास अस्तित्व असून नसून सारखेंच आहे. ज्ञाता आणि ज्ञान यांचा परस्पर संबंध कवींस व त्यांहिपेक्षां तत्त्वज्ञांस अनेक सहस्रकें सतावून सोडीत आहे. कवीची भूमिका सत्यशोधकाच्यापेक्षां सौंदर्यशोधकाची असते, आणि त्यामुळें कोणत्याहि गुणाचें ऐकान्तिक अस्तित्व असतें कीं नाहीं या प्रश्नाचा

निर्णय कवीवर सोपवितां येत नाहीं. वाघमारे हेहि या बाबतींत फारसे खोल पाण्यांत शिरले नाहींत.

"सौंदर्याचा भोक्ता नसतां व्यर्थचि तें जातें" इतकें मर्यादित विधान त्यांनीं केलें आहे.

'—स' हें एक सामान्य प्रेमगीत आहे. यांतील प्रथम पुरुषी नायकास नायिकेच्या हास्याचा विलक्षण मोह वाटत आहे; आणि तो तिला हासण्याची विनवणी करीत आहे. इतर प्रेमवेड्यांप्रमाणें स्वप्रिया त्यास जगताचें केंद्र असून तिच्याच हास्यानें कमलिनी, कुमुदिनी तडागीं फुलतात, आणि पक्षिगण तिला हासण्यासाठीं आळवतात, असें त्यास वाटत असतें.

'संक्रांतीचा तिळगूळ' या कवितेंत कवि स्वबांधवांस उगे रहाण्याचें थांबवा, हृदयांत क्रांति होऊं द्या, सुखस्वप्नें सत्यसृष्टींत आणण्याचा यत्न करा असा उपदेश करीत आहे. भूतकाळांतील रत्नांच्या दीप्तीनें जगाला दिपवण्याचे दिवस गेले; परंतु स्वतःहि त्यांनीं दिपून न जातां स्वातंत्र्य-रूपी ध्येयाचा मार्ग संक्रमण करा असें तो सांगतो. स्वातंत्र्यनाश होऊन सवाशें संक्रांती लोटल्या; प्रत्येक संक्रांतीस

निदान सवाशें तरी प्रासंगिक कविता झाल्या असतील, परंतु संक्रमण मात्र काडीचें देखील झालें नाहीं, असा निराशाजनक विचार मनास उदास करून टाकितो.

रा. वाघमारे यांनीं काव्यरचनेंत जरी आपलें नांव सार्थ करून दाखविलें नाहीं, तरी रा. पुराणिक यांनीं मात्र संस्कृतशब्दप्रचुर शैली, अर्थालंकारांची व अनुप्रासाची सढळ योजना आणि उल्लेखमयता यांच्या योगें आपल्या नांवाशीं इमान राखिलें आहे. कल्पनाविलासाबरोबर अभ्यासाची अवश्यकता आजकालच्या तरुण कविवर्गास सामान्यतः भासत नाहीं, या विधानास पुराणिक हे अपवाद आहेत. त्यांच्या चारच कविता या संग्रहांत आहेत, परंतु त्या दीर्घ असल्यानें त्यांची पृष्ठसंख्या त्यांच्या दोन संवगड्यांच्यापेक्षां कमी भरणार नाहीं. रा. पुराणिक हे मोरोपंती आखाड्यांत तालीम करीत असावे, असें त्यांच्या तयारीवरून दिसतें.

त्यांची पहिली कविता ‘मृत अर्भकास नेतांना पाहून’ हें एक आर्तगीत आहे. मुलानें कोंवळ्या वयांत मृत्युलोक कां बरें सोडिला असावा? पापमय पृथ्वीचा कंटाळा आला म्हणून, कीं नंदनवनाचें सौंदर्य पहावयाची

इच्छा झाली म्हणून, यमानें त्याच्या सौंदर्यास भुलून त्यास चोरून नेलें म्हणून ? इत्यादि शंका कवीच्या मनास स्पर्शून जातात. आईबापांच्या दुःखी मनावर या बालमृत्यूचा परिणाम किती कठोर झाला असेल याबद्दलहि कवि तर्क करितो;

आनंद, मूल पहिलें भुविं जन्मतांना,
देतें अमूप पितृमातृसुहृच्चितांना,

परंतु उलट त्याच्या मृत्यूनें ' विश्वांत शून्य ' दिसावें हें साहजिक आहे. यानंतर पुनः मुलाच्या निधनाच्या कारणांविषयीं अनेक तर्क लढवून बाल्यावस्थेच्या पवित्र माधुर्याची स्तुति करून कवि मनाचें समाधान करून घेतो.

' पावागड ' हें वर्णन व कथनात्मक लघुकाव्य आहे. हा गड गुजरातच्या अफाट मैदानांतील एका उंच पण अविस्तृत डोंगरावर आहे. या डोंगराची परंपरागत उत्पत्तिकथा कवीनें प्रथम सांगितली आहे. २ ऱ्या कवितेंतील आपगा ' विश्वामित्री ' ही होय. या गडानें मुसलमानांशीं अनेक शतकें टक्कर दिली, परंतु १५ व्या शतकांत जयसिंह रावळ नांवाच्या राजाच्या कारकीर्दीत हा

गड महंमद बेगडा याच्या हातीं आला. हिंदु राजवटींच्या पांचवीस पुजलेला विश्वासघात हें या पराभवाचें कारण होय, परंतु भोळवट दंतकथेनें सर्व इतिहास बुजवून टाकिला आहे. कालिका देवीच्या मंदिराच्या घुमटावर मुसलमानी पीर पाय देऊन उभा आहे, परंतु त्याचीहि आम्हांला लाज नाहीं ! एक भाकडकथा शंकितांच्या मनावर फेंकून दिली ( श्लोक २०–२१ ) कीं काम झालें ! श्लोक ३०–३१ यांत सृष्टिसौंदर्याचें सुंदर वर्णन आहे व ' लोकीं वाड असाचि नित्य अग हा पाहीन पावागड ' या अंत्य ओळींत कोटि लढवून काव्य संपविलें आहे. ' अग व ' पाहीन ' या शब्दांवर श्लेष आहेत. ' पावागड ' या शब्दांतून ' ग ' व ' पा ' हीं अक्षरें काढून टाकिलीं असतां बाकी ' वाड ' ( मोठा ) उरते.

' थांबवा न, तिज आज रडूं द्या ' या नाट्यगीतांत अश्रूंचें सामर्थ्य वर्णिलें आहे.

हीं प्रीतिलतेचीं फुलें अश्रुंची माला
कां रोधुन धरितां ? पुसुन टाकतां यांला ?

या टिळकांच्या ओळी ७ व्या कवितेशीं तुलण्या-जोग्या आहेत. दुःखाचा पूर कृत्रिम रीतीनें तुंबविणें हा

दुःखशमनाचा उपाय नव्हे, त्याला पाटच फोडिला पाहिजे.

' खाडिलकरांस ' ही गीतिका आहे. खाडिलकरांच्या नाटकांतील संगीताच्या माधुर्याचें श्रेय नाटककर्त्यास आहे अशा भावनेनें ही गीतिका लिहिली गेली आहे. तथापि त्यावरून कवीची संगीतप्रियता दिसून येते.

तिसरे कवि जोशी यांच्या कविता विशेषतः वर्णनात्मक आहेत. ' वर्षाकाल ' या कवितेंत अस्मानी देखाव्यावर अनेक उत्प्रेक्षा करून शेवटीं जगाच्या स्थित्यंतराबद्दल कवीनें आनंद प्रदर्शित केला आहे. दुसऱ्या कवितेंत उंच भराऱ्या मारणाऱ्या स्वातंत्र्यप्रिय ' घारी 'ची सहानुभूति कवि मागत आहे व ईश्वराकडे तो तिला देशाची दूति म्हणून संदेश घेऊन जाण्यास सांगत आहे. ' सौख्य-कल्पना ' या कवितेंत सुखाच्या क्षणभंगुरतेची कल्पना क्षणभर चमकून अदृश्य होणाऱ्या चांदणीकडे पाहून कवीस येते. ' चंद्रमा ' हें शोकगीत तुळशीवांचून आंगण किंवा अमृतावांचून कलश ओका भासतो तसें जग ज्यास ओकें भासत आहे अशा पत्नीविरही पतीच्या

तोंडचें आहे. प्रियेस स्वप्नांत हासतांना पाहून सुचलेले विचार ' स्वप्नमोहिनींत ' ग्रथिले आहेत. ' कोकिलेस ' या कवितेंत कवि कोकिलेला गायन करण्याची आळवणी करीत आहेत. सर्व सृष्टि जागृत झाली आहे, सर्व सचेतन व अचेतन जग आनंदानें डोलूं लागलें आहे आणि तुझ्या गायनाची मात्र उणीव स्पष्ट भासूं लागली आहे. तूं एकटी बाकीच्या जगताशीं असहकार न पुकारतां आपल्या आवडत्या सहकारवृक्षावर बसून आपलें मंजु गान सुरू कर बरें !

" दुज्या दुखवुनि स्वयें रंजणें
न्याय खरा का असे ? "

असा स्पष्ट सवाल कवीनें कोकिलेला टाकिला आहे. आतां उद्दिष्ट व्यक्तीला हा सवाल पोंचणार कसा हाच सवाल आहे.

रा. जोशी यांची ही शेवटची कविता विशेष सुंदर असून इतर कविता कदाचित् रचनेच्या दृष्टीनें ' प्रयत्न ' या सदरांत घालाव्या लागतील. त्यांच्या कल्पनांच्या पावला-बरोबर रचना पाऊल टाकीत नाहीं; तथापि काव्यबीज त्यांच्या मनोघटनेंत आहेच आहे.

सरते शेवटीं वाचकवर्गानें या तरुण कविमित्रांच्या या प्रथम कृतीचें सहृदय अवलोकन करून या कलिका उमलविण्याचें श्रेय घ्यावें अशी विनंति करून ही प्रस्तावना पुरी करितों.

दांडिया बाजार,<br>बडोदें.<br>ता. ४ जून १९३२

चिंतामण विनायक जोशी.



# १ चान्दणी.

[ चालः—मम सुमन कुणा. ]

ही रम्य चांदणी चमके बहु गोडशी ।
क्षण मृदू जरी चमकते परी, अस्फुट हांसे कशी ! ॥ध्रु०॥

ही अस्फुटयौवनबाला जणुं भासते ।
नभिं लचकत येई, चोरुन वर पाहते ।
तल्लज्जेची ती चमक मुखीं नाचते ।
भाळिती पाहुनी जननयनांबुज निशीं ॥ १ ॥

ह्या विश्वोद्यानीं रम्य फुलें नाचती ।
तीं प्रभा दाविती, स्वानन्दें डोलती ।
ही ताराराणी नाचत येतां अती ।
तीं पहा घालती खालीं माना कशीं ! ॥ २ ॥

ती चमके तेजें ललनानयनीं जनीं ।
ती गतींत विलसे कारंज्याच्या क्षणीं ।
ती हास्य हांसते कलिकावदनीं जनीं ।

हिरकणीच चमके विश्वकोन्दणीं जशी ॥ ३ ॥
ह्या नभीं चान्दणी हितगुज–हास्यें करी !

ती इंदुसंगतीं उधळी रंगा वरी ।
ती विमल शुभ्रता प्रतिबिम्बे भूवरी ।
बघ, पुष्करिणी करि नलिनी–हास्या कशी ! ॥४

ती प्रभा दाविते पुण्यात्म्याची खरी ।
जणुं स्वर्गसुखाची जाणिव आम्हां करी ।
कीं दुःखार्णविंच्या नौका वारीवरी ।
ती स्वर्गिय खिडकी खुली असे प्रतिनिशीं ॥ ५ ।

ती चटक लाविते पापात्म्याला भली ।
ही सोबतीण त्या दुष्कर्म्या लाभली ।
ही चंचलताची अंगिं तिचे बाणली ।
नव चटकचान्दणी भुलवी त्यातें अशी ॥ ६ ॥

चान्दणी भासते चंचल परि ती नसे ।
या चंचल जीवा मौजा दावीतसे ।
परि आशावाद्या ध्रुवतारा गमतसे ।
ती निश्चल, चल वा, भासे जगतीं अशीं ॥ ७ ॥

---

# २ पाऊस



( चालः—मम सुमन कुणा. )

हा पाउस बघ गे ! किति तरि सोंसावतो ।
या क्षितीवरी रविकरांपरी अविरत वर्षावितो ॥ ध्रु० ॥
हा ग्रीष्मर्तूचा रिपुची भासे महा ।
अरिदमन तयानें तूर्णचि केलें पहा ।
तो हतबल ढाळी पूर अश्रुंचे महा ।
करि दमन खलांचें करुणाघन ईश तो ॥ १ ॥

हा पाउस सखये ! भूमिरमण भासतो ।
या सरी नव्हे गे ! प्रेमा तो लोटितो ।
त्या अनुमति देण्या तरुगण डोलावतो ।
या धरणीहास्या खुलवी वर्षाव तो ॥ २ ॥

ही धरा हांसते उन्मादें या क्षणीं ।
या हास्योर्मींची हिरवळ होई जनीं ।
ती करपुन जाई ग्रीष्मातें पाहुनी ।
नवचैतन्यासी दे मग वर्षाव तो ॥ ३ ॥

हीं धरा तापते विरहाग्नीनें यदा ।
शिखिरूप होउनी मग ती नृत्यें तदा ।
बहु करुणालापें याचितसे तोयदा ।
जणुं झडकरि येण्या रमारमण धांवतो ॥ ४ ॥
या सरी सखे गे ! ईश्वरप्रेषित गणी ।
त्या कृषीवला द्यावयास स्फूर्ती जनीं ।
ती चंचल चपला भुलवी मुख दाउनी ।
वर्षावि गातसे गगनीं अवलोकिं तो ॥ ५ ॥

---

# ३ माझी छत्री.



[ ही कविता वाचतांना रे. नारायण वामन टिळक यांच्या ' कवि ' या कवितेची आठवण होऊं न देण्याची वाचकानें सावधगिरी बाळगावी. ]

( जातिः—गीति. )

नकळे कोठुन होते लतिकेच्या ठायिं पुष्पपरिपूर्ती;
नकळे केव्हां तुटण्या होते मम छात्रिच्या मना स्फूर्ती.
नकळे कोठुन येती द्विजराज नवे वसंतकालीं ते;
नकळे कोठुन तुटती सळया फाडून कृष्णवस्त्रानें. २

नकळे कोठुन येतें शोभा द्यायास हास्य अधराला;
  नकळे कैशी शोभा देती छिद्रें जुनाट छत्रीला. ३

तारांगणिं मग खेळे दृष्टी करण्या विनोदहास्यातें;
  पाणी प्रेमानंदें भिजवी माझ्या विषण्ण आस्यातें. ४

हांसति नर मग मजला, पक्षी करिती अनेक गुजगोष्टी;
  'हें काढ चित्र याचें' सांगे जणुं कामरूपिणी सृष्टी. ५

येतां पूर नदीला थांबे तो काय दोन हातांना ?
  तैसा कोण म्हणे 'बा! थांब,' जगाला मलाच बघतांना?

आक्रोश जनपदांचे तितुक्या कालांत त्रासविति इतुके,
  त्यांचे ध्वनी गणावे कोणी गांवांत जाहले तितुके ? ७

गडबड झटपट करुनी साहुनि ऐशा उगाच शब्दांतें,
  वळतों गृहाप्रती मी, ना मग खर्ची अनेक 'मिनिटां' तें

वर देवदूत बसले मानवहृदिंच्या धरून कीलातें.
  नाचविती, करवीती स्वेच्छेनें त्यांकडून लीलांतें. ९

त्याचें दुःख कशाला ? करवीता तो धनी निराळा हो !
  छत्रीद्वारें रसिकां हास्यरसाचा करून दे लाहो १०

# ४ सिगारीची तलफ.



सिगारिची तलफ समद्याहुनी लइ न्यारी ॥ ध्रु० ॥
इनं साह्यबा येडं केलं,
धनधान्याचं मातेरं झालं,
गोरगरिबां भिकं लाविलं,
भल्याभल्यासि झाली भारी ॥ १ ॥
नवराबायकोंत तंटा करी,
मुखामुखांत घाणचि मारी,
ल्योक बाबासि धूरें मारी,
इचा वासच गोड भारी ॥ २ ॥
इला साह्यब फारच मानी,
देशि साह्यबही तिस वानी,
जमादार, शिपइदादा, गणी,
काशि मोहनी घाली भारी ॥ ३ ॥
देसभगत सेवन करी,
घालि परदेशि मालावरी

अशि हरताळ, जाळी तरी,
इस म्हणूनि अंगिकारी ॥ ४ ॥

मानवाची हि कन्या असे,
ईंत इष्णूचा यज्ञ वसे,
शंकराची ही वल्ली असे,
तिन्हि लोकांत कीरत भारी ॥ ५ ॥

---

# ५ आंधळी कोशिंबीर.



" God creates the love to reward the love.
—Browning.

" Love is blind."
—Popular Saying.

" Truth is stranger than fiction."

प्रणयदेवते ! कवण्यामार्गें सांगु तुला आतां ?
हृदय कांपतें, ओष्ठ स्फुरती, कंप भरे हातां ! १

विचारशिल तूं ' काय जाहलें ? महा व्याघ्र आला ?'
  व्याघ्र नाहिं परि आठवतो गे! तो दिन आज मला ! ४

त्या दिवशीं तूं सख्यांसंगतीं निर्भय चित्तानें,
  आंधळि कोशिंबीरचि खेळत होतिस मौजेनें. ५

उत्साहें तुज शिकवाया मज देखुनि येतांना,
  स्तब्ध जाहलिस, घडी मोडली तेव्हां रमतांना.

पुष्प सुकोमल पवनासंगें रमतांना वाटे,
  अत्यानंदाचि मना जाहला तेविं, नव्हे खोटें. ६

सखये ! स्मरती का तुज माझ्या हृदयाचे बोल ?
  ' शिकणें नाहीं आज जिवलगे! चालूं दे खेळ ? ' ६

जरी लाजलिस तरी खेळण्या केलिस सुरुवात,
  शांत मनानें पहात होतों बसोनि खुर्चीत. ७

मातापितरें कोणी नव्हतीं घरांत तत्समयीं.
  प्रेमप्रवाहीं वहात गेलों क्रीडा तव बघुनी. ८

खेळ पाहतां विचार आला, कां नकळे मजला:
  ' प्रेम आंधळें असुनी इच्छित वस्तु दिसे त्याला. '

खरें असे कीं कवी-कल्पना, प्रत्यंतर बघण्या
मना वाटलें, सज्ज जाहलों त्वत्संगें रमण्या. १०

छात्र घेउनी सांगितलें मीं, ' डोळे मम बांधा; '
मनांत हेतु प्रेमप्रकाशें शोधिन मी तुजला. ११

तुझ्या सख्या जरि हसूं लागल्या तरि ना बावरलों,
अंध असोनी प्रणयमार्गिं मी अच्युतची ठरलों. १२

सर्वांमधुनी तुला शोधुनी धरिलें अवळोनी,
सत्य वाटली कव्युक्ती ती, साक्ष मना पटली. १३

हाय ! परि जणूं वीज कडाडे निरभ्र आकाशीं,
तत्सम गर्जे तव माता ऋणिं येउनि दाराशीं !! १४

' प्रेमप्रकाशें अंधहि देखे प्रेमवस्तु जगतीं, '
तत्त्व जरी हें सांगितलें, तिज उमजेना चित्तीं ! १५

त्या-दिवसापासून पारखा झालों तव गेहा;
मीन जसा पाण्याविण मरतो, तुजविण तेवीं हा !!! १

# ६ " दैवदुर्विपाक."



ही कळी सुबक बघ आली,

दंवबिन्दुमौक्तिकें ल्याली, ही कळी.

ही प्रभा उषेची भाळीं,

तारुण्यमदानें झुलली, ही कळी.

ही पवित्रतेची मूर्ती,

कौमार्यप्रभेची पूर्ती, ही कळी.

या नभिंच्या चंचल तारा

लाजतील बघुनी साऱ्या, ही कळी.

स्वर्गीय प्रभेची कान्ती

वेष्टूनि डुले भूवरतीं, ही कळी.

\+ + +

उन्मत्त भृंग हे जमती,

तन्नादें वेडे होती, देखुनी.

कीं मयूरचातक डुलती

त्या चंचल चपलेवरती, मोहुनी.

कृतकृत्य मानसीं होती
ध्येयातें पाहुनि हातीं, तेथुनी.
परि एक बालिका आली,
अन् कळिला घेउनि गेली, सत्वरीं.
ती कोण ? फुलांची राणी
उद्यानीं रमते गाणीं, गाउनी.
ही कळी, परी ती कलिका
तारुण्योद्यानींची का, भासतें.
रक्षण्या धांवुनी आली,
भगिनीला घेउनि गेली, वाटतें.
ती खोवुनि सुंदर कलिका
मस्तकीं निघे ती लतिका, तेथुनी.
त्या हितगुज करिती बाला,
आल्हाद मनाला झाला, देखुनी.
आक्रोश करिति मग सारे,
परि होणारें तें झालें ! बापुडे ! !

———— ————

# ७ फूल व फूलपांखरूं.

प्रसूनसमयीं नवपुष्पें तीं आल्हादचि देती,
प्रभातकालीं सौंदर्यानें जना डुलवितातो, १
इकडुनि तिकडे पवनिं मनोहर झोले घेऊनी
फुलें दाविती सौंदर्याची सीमा मर्त्यजनीं, २
सुमन मनोहर दिसतें जणुं तें कौमार्यचि विलस,
फूलपांखरूं उत्सुक होई देखुनि त्या खासें, ३
फूलपांखरूं सुंदर नाजुक पराग उधळूनी,
पराग कसले! कौमार्यचि तें टाकी भंगूनी, ४
भोग जाहला, दुष्ट पांखरूं गेलें तेथून
दुसऱ्या सुमना उपभोगाया यातें सोडून, ५
खेळ जाहला, फूलपांखरूं गेलें मोदभरें.
मोद कशाचा सुपुष्प जातां भंगुनि एकसरें? ६
रम्योद्यानीं थंडगार हा वारा वाहतसे,
अश्रु दंवाचे ढाळुनि सारें तरुकुल कांपतसे. ७

× × ×

फूलपांखरें अगणित असती सुजीवितोद्यानीं,
अपार सुमनें विघाडिति त्याची दाद न ये कानीं. ८

# ८ पायदळीं पडलेल्या बकुलपुष्पास—



( चालः—राजहंस माझा. )

बहु म्लान वदन कां झालें ? । बा पुष्पा ! सांगें मजला ॥ध्रु०॥

सौंदर्य कुठें तव गेलें ? । दुष्ट कोण ऐसा आला ? ॥

हा घाला दुर्दैवाचा । तव नाशा कारण झाला ॥

तव रसिक कसे ना गणती । तव हृदयीं शिरला भाला ॥

तव सौंदर्याची हानी ।
जरि झालि दिसे ही नयनीं ।
मृत्तिका पडे तव वदनीं ।
परि सोडुं नको धीराला ॥बा पुष्पा०॥१॥

स्वर्गींचा तारा तुटला । भूगर्भीं पार बुडाला ॥

क्षण दिपवुनि जरि तो गेला । जगताचे हृदयीं भरला ॥

जरि मृत्यू त्यासी आला । परि अमरकीर्ति देण्याला ॥

बा पुष्पा ! तेवीं तुजसी ।
जरि मृत्युमुखीं तूं पडसी ।
श्रेष्ठता परी ती घेसी ।
हो कारण या कीर्तीला ॥ बा पुष्पा० ॥२॥

जरि पूर्वापार कवींचीं । कवनें तीं गाति गुलाबा ॥
सौंदर्य जगाचें, म्हणती । ये सत्ता अखिल गुलाबा ॥
श्रेष्ठता तुझी ना गणती । आश्चर्य खरें मज तें, बा ॥

भरज्वानी परि ती जातां ।
सुकल्यावरि सुगंध जातां ।
मोलाचें मोलहि जातां ।
बघ, गुलाब फोलचि ठरला ॥ बा पुष्पा० ॥३॥

जरि नाश पावती सगळे । श्रेष्ठाचें नांव निराळें ॥
सद्गुण हा मंदिर बांधी । कीर्तीचें जगतीं, गमलें ॥
बकुलपुष्प नाशा पावे । परि रम्य गंध दे सगळे ॥

न्यूनताहि त्यासी असतां ।
कांव्याचें गुलाब असतां ।
श्रेष्ठताहि त्यासी देतां ।
हा न्यायहि सांगा कुठला ? ॥ बा पुष्पा० ॥४॥

जरि गुलाब नाजुक असतो । नयनांला दे आनंद ॥
बकुलपुष्प नाजुक असतें । हृदयातें देई गंध ॥
सुकलेला गुलाब पाहीं । न घ्राणीं देइ सुगंध ।।
बकुलपुष्प सुकलें जरि तें ।
दीर्घताच गंधा येते ।
श्रेष्ठता म्हणुनियां त्यातें ।
ऐसि ये बकुलपुष्पाला ॥बा पुष्पा०॥ ५ ।

---

# ९ सादास पडसाद.



" O, world, as God has made it ! all is beau
And knowing this, is love, and love is duty
—Browning.

पुष्पें, तरुवर, निर्झर, कूजित, रम्य गमति जगतीं;
परि ते कोणा ? निसर्गप्रेम्या, इतरा ना रुचती. १
फूल फुलालें, परि तें गेलें व्यर्थचि नाशाला,
भोक्ता नसतां सौंदर्याची प्रतिमा बघण्याला ! २

लतिका, झाडें, झुडुपें उगती, उद्यानीं डुलती,
फूलपांखरें, पक्षी नसतां निस्तेजचि गमती. ३
उद्यानाची तारुण्यश्री उन्मादें विलसे,
प्रियकर बघण्या उत्कण्ठित कीं झालीशी वाटे. ४
प्रियकर नसतां आर्त होउनी ढाळी अश्रुजळा
दंवरूपानें म्लानमुखानें दुःखित स्नेहाळा ! ५
सौंदर्याचा भोक्ता नसतां व्यर्थचि तें जातें;
मूर्खाजवळी ज्ञानसिंधु परि उमजेना त्यातें. ६
विश्वमालिकेमाजीं प्रमुदित दिसती जीं पुष्पें
प्रेमरज्जुनें गुंफित असती, भिन्न जरी स्वरुपें. ७

## १०–स.

[ चाल:–वसंत ज्या म्हणती. ]

रविशशि मज गमती,
तुझे स्मितिं रविशशि मज गमतीं,
कमलिनि कुमुदिनि फुलति तडागीं हास्यें तव जगतीं.

हास्या नाहिं मिती,
तुझ्या मृदु हास्या नाहिं मिती,
या जगदुद्यानीं रम्य चारुता आणी नव तें अती.
तव हास्य नसे तें अमृतचि मज भासतें,
नवजीवन तूर्णचि मृत आत्म्या लाभतें,
तव हास्यसिंचनें दुःख सौख्य होइ तें,
जादू अशि नव ती,
सुरम्यहि जादू अशि नव ती,
जणुं स्वर्ग भासतो मला पातला हास्यरुपें जगतीं ॥ १ ॥
रवि ये उदयाचळीं,
प्रतिदिनीं रवि ये उदयाचळीं,
जणुं तव हास्याचें पान घ्यावया येइ नभोमंडळीं,
सौंदर्य जणूं कीं नौका वारिवरी,
पूर्णचंद्र भासे हास्यरुपें तो वरी,
मी नुरते लेशहि तेव्हां भवसागरीं,
आनंदाचि तो अती,
उद्भवे आनंदाचि तो अती,
मज ब्रह्मानंदहि तुच्छ वाटतो तत्क्षणिं त्या पुढतीं ॥ २ ॥

हास्या तव बघुनी,
खरोखर हास्या तव बघुनी,
जणुं उषा वाटते प्रिया रमविते हास्यें तीं हंसुनी.
तव हास्याची ती गोड खळी पाहुनी,
नैराश्य जातसे लज्जितची होउनी,
नव अशा वाटे ठेवी मन गुंगुनी.
चमत्कृती ही अती,
गमे मज चमत्कृती ही अती,
जणुं हास्यें पावन मानव वाटे ईशपदीं जाती ॥ ३ ॥
पक्षीगण गाती,
प्रभातीं पक्षीगण गाती,
जणुं अळविति तुजला स्मित तें हंसण्या मंजुरवें जगतीं.
तूं हास म्हणुनि मी विनवीं आतां तुला,
सौंदर्य गुलाबी गालीं दावीं मला,
तव कृपाकटाक्षें पावन करिं तूं मला,
भक्त असा बनलों,
तुझा मी भक्त असा बनलों,
जणुं स्मित मज वाटे तोयदवारी, चातक मी झालों ॥४॥

# ११ संक्रान्तीचा तिळगूळ.



( वृत्तः—मंदारमाला. )

संक्रान्तिचा काल आजी उदेला,
परी काय तुम्ही असें राहणें ?
ही संधि सोडोनि या संधिकाळीं
मिळे काय तुम्हां उगें राहुनी ?
देशांतली आग ती शांतवाया
झटा ओपुनी उष्णरक्ता तुम्ही;
उत्क्रान्ति तेव्हांचि होणें असे ती
यदि क्रान्ति होई तुम्हांभीतरीं.
उत्साह बाणे यदा अंतरंगीं
सळाळे बहू रक्त तेव्हांच तें;
लोटी कृतान्तासही तोचि मागें
धडाडी अशी ये जयालागुनी,
घेई भरारी न स्वातंत्र्यमार्गीं
कशाची तया ध्येयप्राप्ती असे !

तो जन्मुनी काय केलें तयानें ?
　　　　वृथा माय त्याच्या भरें शीणली !
स्वप्नें सुखाचीं न होती मजेचीं
　　　　जरी सत्यसृष्टींत ना भासती.
रत्नें जरी भूतकाळांतलींही
　　　　न त्यांचीं प्रभा देत शांती मना.
त्यांचीं भुतें नाचती दृष्टिमार्गीं
　　　　परी रोधिती ध्येयमार्गा न तीं.
‘ उत्तिष्ठ रे, ना तरी देह त्यागीं, ’
　　　　अशी टोंचणी लाविती तीं मना.

\+　　　　+　　　　+

स्फूर्ति प्रभो, देइं त्या दीनभागां
　　　　दया त्यांवरी आणुनी अंतरीं !
हा म्हाळसाकान्तसूनु प्रभातीं
　　　　असें प्रेम दे तीळगूळांतरीं.

———

# एका मृत अर्भकास नेतांना पाहून--

वसंततिलका.

नीडासमीप हिरवीं निरखून रानें,
केलें मनीं गमन निश्चित पांखरानें,
रानांत तें सहज जाउनि बागडाया,
हा ! लाविते स्वजननीसि पिलूं रडाया ! १

बा अर्भका ! बघितला न तुवां अजून,
तों कोंवळ्या तव मनास गमून जून,
त्वां टाकिला अघ असा इहलोक काय ?
कंटाळला त्वरित कां तव दिव्य काय ? २

तूं देवपुत्र, तुज नाकचि आवडावा,
मर्त्यांत लोक अवलंबिति मार्ग डावा,
तेथें रुचेल तुज वास कसा अपापा !
जेथें परार्थ करिते जनता हपापा ? ३

येथें मुळींच परिमाण नसे अघास,
जातो कदापि न सुखें वदनांत घास,
राहावयास असल्या भुवनीं वळावें,
कैसें तुझें हृदय, जें न तुला कळावें ? ४

येथें नसे अणुहि नंदन-सौख्य कांहीं,
पृथ्वी तुवां त्यजियली म्हणुनीच का ही ?
होतें तुवां बघितलें वरि नंदनास,
तेव्हां तुझ्या रण मही गमली मनास ? ५

जों स्पर्शिलें न तनुनें तव भूमिकेला,
तों कालकालभुजगें तुज दंश केला !
अज्ञात ही जगतिं रीति न मानवांस,
पानें जुनीं त्यजुनि तोडिति पल्लवास ६

' त्वत्पूर्वपापनिधिनें, ' जन बोलतात,
' बोलाविला असमयीं असल्या कृतांत, '
जे मागती मरण तें न तयांस येतें,
तत्पूर्वजन्मकृतपाप ह्मणूं नये तें ? ७

तूंतें अजून फुटले पुरते न दंत,
व्हावाहि हंत ! इतक्यांत शिशो ! त्वदंत !

नाहींच जों विकसली पुरती मुदानें,
तों ती अशी चिरडिली कलिका पदानें ! ८

पाहावयास तुज पाठविलें प्रभूनें,
हा लोक, जो घटित होय समुद्रभूनें,
होशील तूं मालिन भूवरि, संशयानें
नेलें अशा तुज पुनः त्रिदिवीं तयानें ? ९

अव्याजसुंदर तुझेंच शरीर हें वा
वाटून अंतकहृदा, निरखून, हेवा,
चोरूनि ने तुजसि येथुनि काय धर्म ?
झाला न लज्जित कसा करितां अधर्म ? १०

वा ! सर्वथैव तव मंजुलहास्यवीचि
स्वें मार्दवें कठिनता हरित्या पत्रीची,
देखूनि त्या निवळला नच केविं काळ ?
तूतें हरी, न तव जों सरली सकाळ ! ११

होशील तूं ऋत पुढें प्रतिधर्म ताता !
वाटूनि धाक असला हृदयीं कृतांता,
बाल्यांत या निपाटिलें तुज काय त्यानें,
जैं रोपटें मृदु समूळचि कोयत्यानें ? १२

ते बोबडे मधुर बोल तुझे श्रवाया
कोठूनि बा ! असुख यावरि घालवाया ?
ज्यायां तुझा रुचिर शब्दसमूह गेला !
ये पूर हा ! तव गृहीं असुखापगेला ! १३

झाली असेल तव बा ! जननी उदास,
धक्का असेल बसला तिचिया हृदास,
फोडीत ती अहह ! हाच असेल टाहो,
'गेला, त्यजूनि मजला, शिशु एकटा हो !' १४

स्वप्नींहि बालस्मृति हाय ! तिच्या नसेल,
वाईट कोठुनि तिच्या हृदयीं वसेल ?
होतात मातृहृदया शिशुवेदनाही,
चिंता अमंगल तिच्या शिवणार नाहीं १५

घेतां जिला तव मटामट चुंबनें तीं,
'संतृप्त ?' तृप्ति पुसतां, वदलीच नेति,
प्रेमा तिचा अतुल बा ! तुझियावरील
आक्रांत आज रडुनी न कसा करील ? १६

झालें असेल बहु दुःख तुझे पित्याला,
तें दाबणें तदपि भाग असेचि त्याला,

बोलून, ' चक्रच असे फिरतें भवाचें, '
गाळील बिंदु नयनांतुनि आसवांचे  १७

सर्वस्व आत्म धरुनी तव जीवितांत
होते सुखी तव किती जननी व तात !
पाहूं, अमूप, शकलें, सुख हें, न दैव,
सौख्यांत जें गरल कालवितें सदैव  १८

शून्यांत विश्व दिसतें जंव पंडिताला,
विश्वांत शून्य दिसतें तंव दुःखिताला,
कैसा असार भव हा न तयां दिसावा,
जातां लयाप्रति तदीय भवीं विसांवा ?  १९

व्हावें शिशो ! तुजविना तव आज ओकें
कैसें न, दाउनि मुखावरि दैन्य, ओकें ?
वाटे असा जर विषाद अचेतनातें,
त्यांना कसा न, जन जे धरितात नातें ?  २०

मातापिता तव वियोग न साहतील,
नेत्रांबु ते स्मृतिवरी तव ढाळितील,
त्वां टाकिलें जरि असे पृथिवीतलातें,
स्वांतीं तथापि बघतील तुला सुला ! ते  २१

आनंद, मूल पहिलें भुविं जन्मतांना,
देतें अमूप पितृमातृसुहृच्चितांना,
त्याहूनि होति परि ते बहु दुःखितांत,
त्याचा करी अहह ! अंत जधीं कृतांत २२

येतां वसंतऋतु, तो हृदयास मानें,
ये ग्रीष्म तापद अनंतरही क्रमानें,
वर्षागमेंचि जन तप्त सुखास लाहे,
हा सृष्टिचा क्रम निरंतर चाललाहे २३

'आहेच, आज मरणें, ठरलें, उद्यां वा,
'आसीं कशास हृदया मग शीण द्यावा ?'
हें ज्ञातृभाषित मनास जरी पटेल,
कैसें तरी प्रणयबंधन तें तुटेल ? २४

फांकेच नीर, जंव पूर नदीस येतो,
जों पूर तो उतरतो, शमती पयें तों,
दे दुःख, पाहुनि, मना, विपरीत, माया,
काळेंच लागत असे परि तें शमाया २५

कांहीं करेंच नव्हतें करवावयाचें,
जन्मा निरर्थक दिले श्रम यावयाचे

कां ईश्वरें मग तुला ? करणी तयाची
नाहीं कदापि मनुजांस कळावयाची २६

नाहीं अजूनि सुटलें तव दुग्ध तोंका !
तों काळ घावहि तुझ्यावरि घालितो कां ?
अस्तित्व काय रुचलें न तुझें यमाला ?
आली दया न तव त्या अधमाधमाला ? २७

टाकूनि वृद्ध निधनेच्छु कठोर काला !
कां भक्षितोस अतिकोमल अर्भकांला ?
त्वां भक्षिलें जगतिं आजवरी अनेकां,
घ्यावी अतृप्ति तरिही तुझिया मनें का ? २८

त्वां बालकांत करण्याकरितां उठावें,
काला ! तदीयजनदु:ख तुला न ठावें,
त्यांपासुनी शिशु न केवल तोडितोस,
तत्प्राण त्यासहित तूं परि ओढितोस. २९

तूं भक्षिसी प्रथम मानवजीवनातें,
देसी अनंतर तनूहि हुताशनातें,
रक्षाहि वायुस, तसाच तदस्थिराशि
देतोस तूं अदय पश्चिमदिग्वराशि. ३०

एवं च ज्यावरि फिरे तव दुष्ट हात,
तच्छेष हाय ! अणुमात्र नसे रहात,
सूड–प्रवृत्ति जरि राक्षस तो वरील,
ऐसी गती तदपि तो न कधीं करील. ३१

क्रौर्येंच कापिसि गळे खल तूं मुलांचे,
यद्देह कीं घडियले विधिनें फुलांचे,
कीजे कसा तुजसि दंड न ईश्वरानें ?
तो स्तब्ध काय बसला तुझिया दरानें ? ३२

बाळा ! तुझें अरुणकांति बघूनि अंग,
'माझ्याहुनी अधिक तांबुस बाल अंग !
'मी पंगु, हा न, रवि यास करील सूत,
'याशीं कसें मग जमेल मदीय सूत ? ३३

'हा मूर्त विघ्न गमतो शिशु मत्पथांत,
'अन्यें न, म्यांच बसणें रविच्या रथांत,
'वेळीं बरें उपटणें तत्कंटकाला,
'मी मारवीन रिपुला मम–दारकाला' ३४

या मत्सरें अरुणमानस पेट घेतें,
सोत्कंठ बा ! हननसंधि तदा बघे तें,

होते विचार बहु चालत जों मनाचें,
झालें तया स्मरण तों रविनंदनाचें ३५

सांगे यमा अरुण, ' बाळ जगावयाला
' आहे अयोग्य, तरि ठार करीं तयाला,'
मित्रार्थ कर्म यम हें करण्या निघाला,
आला तुझ्यावरि असा मग काय घाला ? ३६

बालार्क ताम्रवपु पाहुनियां त्वदीय
बोले, ' न सुंदर असें वपुही मदीय,
' स्पर्धा जधीं पृथुक हा मजशीं करील,
' अर्घ्यें मला न मिळतील धरेवरील ३७

' हा देखवेल अपमान मदीय मातें,
' कीं जो बळी करिल मद्रिपुतें–तमातें ?
' देईन जीव, म्हटलें, तरि शक्य नाहीं,
' आहें चिरायु, सहवेल न यातना ही ३८

'होण्यास हें सकल कारण हेंच मूळ,
'हें टाकितोंचि उपटूनि अनर्थमूळ,'
घे त्वत्तनूमधुनि शोषुनि उष्णता हा,
ये अंत काय म्हणुनी तव जीविता हा ! ! ३९

पाहून कीं तव मुखेंदुस इंदु लाजे,
बोले, 'न या विधुस लांच्छन कां, मला जें ?
'काळें मला वदन बाल करावयास
'पाडील भागाचि, न मी जगवीन यास' ४०

होई यथार्थ तव तन्मन बा ! भुकेलें,
वर्षूनि का हिम तयें तुज शीत केलें ?
ऐसें कुकर्म करितां बघुनि भ्रतारा,
झाल्या न धिक्कृति कशा करित्याहि तारा ? ४१

आकर्षिलें तव हृदा तव अंतरंगें,
तेंव्हां तुझें हृदय तें बघण्यांत रंगे,
तें थांबलें क्षणभरी निरखावयाला,
केलें तुवां गमन तोंच यमालयाला ? ४२

निद्रा बसे तुजसि घेउनियां निजांकीं,
बोले, तुझ्या बघुनि ती वदनांबुजा कीं,
'बाई ! अशी न दिसली मज गोड मुद्रा,
'सोडीन या पळभरीहि न मुत्समुद्रा. ४३

'अंकीं सदैव मम बाळ असा निजावा,
'मांडीवरूनि मम हा न उठूनि जावा.

तूंतें तिनें निजविलें म्हणुनी असें का ?
ती होय कारण परि स्वजनाश्रुसेका ! ४४

काचित् सुपर्वतनया जननीस सांगे,
'खेळावयास मज बालक गोडसा गे !
'आणूनि भूवरुनि दे,' बहु हट्ट केला,
केलें तिनें प्रतिघलक्ष्यचि अंबिकेला. ४५

सांत्वावया धरि सुता दृढ हट्ट तीस,
हेका तिचा सूरवधू कथिते पतीस,
कन्येचिया दृढहठा पुरवावयाला,
नेलें सुरें तुजसि काय निजालयाला ? ४६

जी वाहते भरुनि दुग्धरसें तुडुंब,
त्या स्वर्णदींत पृथुका ! चिरकाल डुंब,
ताराकुलें रमवितील तुला नभीं तीं,
दावील बा ! वरि तुला न तमिस्र भीति ४७

जा, खेळ तूं सुखभरें गगनांगणांत
तारागणासहित दिव्यरजःकणांत,
येऊं नकोस बघण्याकारितां धरा हे
आतां पुन्हां, परि दिवीं चिरकाल राहें ४८

जे जे प्रकार घडती इह मृत्युलोकीं
स्वेच्छानुरूप मग त्यांप्रति गा ! विलोकीं,
व्हावें परंतु न तुझें मुख गोजिरें तें
बा ! म्लान, पुष्पसम, देखुनि या धरेतें ४९

आत्मा पवित्र छकुल्या ! तव शांति लाहो,
स्वर्गांत तूं प्रिय गुणीं दिविषत्कुला हो,
शीर्षावरी कर तुझ्या असतां सुरांचा,
तूंतें न धाक पडणें यमकिंकरांचा ५०

पाहीन हास्य तव मी वरि तारकांत,
तेथें दिसेल मजला तव देह कांत,
तारांत तेज अवलोकुनियां नवीन,
रे बालका ! तव सुमूर्तिस आठवीन ५१

स्त्रीरूप, पाप, बघतां, हृदया शिवेल,
तें बालरूप बघतां परि उद्भवेल ?
ऐसें विलक्षण असे बल शैशवांत,
त्याभोंवतीं फिरकतो न अशुद्ध वात, ५२

बाल्यांत जी मधुरता, न तशी कशांत,
ये, ठेवितां, कळुनि हें, हृदयास शांत,
बालावरी फिरवितां यम आत्मपाणि,
यावें कसें न, बघुनी, नयनांस पाणी ? ५३

# पावागड.

शार्दूलविक्रीडित.

जेव्हां इंद्रजिताचिया शरबळें युद्धांत रामानुज
होई मूर्च्छित, तैं सुषेणभिषगें वा ! धाडियेलें तुज
वेगें द्रोणगिरीस, कीं मिळविण्या दिव्यौषधी वानरा !
तूं झालासहि सज्ज, ते नुमगतां, अद्रीस नेण्या खरा !
जेव्हां मारुति ने गिरीस, पडला तत्खंड मार्गीं तदा,
तो पावागड यापरी जनपदीं प्रख्यात पावे पदा,
होती या विविधौषधी गिरिवरी विज्ञात वैद्यां गुणें,
ज्या स्थानीं वनदेवता निवसते, तेथें कशाला उणें ?
नाचे ब्रह्मपदावरी सतत कीं भक्षूनि लोहास जो,
निर्माया प्रतिसृष्टि आणि विधिशीं स्पर्धा कराया सजो,
ठायीं या तप तो करी, निजबळें निर्माणही आपगा,
वाहे अल्पजला, परंतु गुरुच्या नामास मोठ्या अगा !
आधीं गाधिज तो करी नराशिरें, त्यांचे पुढें नारळ,
झाली हे गति तेविं, जेविं विधिची होतांच तारांबळ,

निर्मात्यापरि कोपते कधिंकधीं लोकांवरी ही सुता,
बापाचा गुण लेंकरांत उतरे, हा पाठ दे तत्त्वतां. ४

होता दुर्ग किती सुरेखाचि असा पूर्वीं अहा! या स्थळीं !
जैसा भीम नरांत, त्यापरिस हा दुर्गांत होता बळी,
ठेवी भूवरि एक पाद, दुसरा तो अंतरिक्षांत ने,
न्याया शत्रु रसातलाप्रति बघे, केलें जसें वामनें ५

नाहीं ओबडधोबड प्रथितशां दुर्गांपरी तो दुज्यां,
नांवातें धरिती, न दुर्ग परि जे, त्यांसारिखा ना खुजा,
जातां आंत फसेल शत्रु, रचना ऐशी जयाची असा
वाटे थोर अपौरुषेय मजला दुर्गेश हा वेदसा ६

किल्ल्याचे अवशेष मात्र उरले, प्रासादहर्म्यादिक
गेलें वैभव तें लयास अवघें, सौंदर्य तें आणिक,
तुंगद्वारसमुच्चयास बघणें दुर्गाचिया हें उरे,
जो प्रत्यक्ष करूं न काळ शकता, तो ध्वंस केला नरें ! ७

गेला म्लेच्छकरांत दुर्गवर हा विश्वासघातामुळें,
त्यांनीं राजकुला न केवल, अहो ! दुर्गासहि ध्वंसिलें,
काली जी शिखरीं विराजत असे, हा ! भ्रष्ट केलें तिला,
शिक्कामोर्तब आपुला शिरिं तिच्या त्यांनीं करूनी दिला ! ८

होता राज्य करीत एक नृप या पूर्वी स्थळीं चांगला,
होता दुर्ग यथार्थ, यत्न यवनें केला, न तो जिंकिला,
होता एक नृपाप्त, त्यास वश तो घेई करूनी मग,
हा ! विश्वासविघातशत्रु करवी देशा भल्या दुर्भग ! ९

पोतीं धान्य भरूनियां गिरिवरी जीं जात त्यांमाजिं तो
एकेका यवनास बैसवुनियां दुर्गांत त्या धाडितो,
तेणें सर्व अविंध यापरि खलें दुर्गांत ते आणिले,
त्यांहीं रात्र बघूनि, युद्ध करुनी, भूपास त्या जिंकिलें. १०

भूपातें वधिलें, सतीत्व हरिलें स्त्रीचें, गृहां जाळिलें,
आप्तातें न दिलें, जरी ठरविलें होतें, न संमानिलें,
'कीं हा घातक, यास शासन हवें,' ऐसें म्हणूनी तयीं,
त्यातें तों उलटें कड्यावरुनियां कीं लोटिलें निर्दयीं ! ११

घाताचें फळ घात, काय दुसरा ही बोध देते कथा ?
ग्रासी नाश विघातका न चुकतां, राहु द्विजेंद्रा यथा,
केला आजवरी विनाश जगतीं विश्वासघातें किती !
जाणोनी इतिहासनीति कटु हे, ते दुष्ट उल्लंघिती १२

पूर्वी जो रजपूत राज्य करि या भागांत तत्सुंदरी
होती ख्यात, गुणान्विताहि, अभिधा चंपावती जी वरी,

स्त्रीशीं नित्य करी विलास नव तो लोकेश नानाविध,
तन्नामें वसवी नृपाल पुरही या डोंगरासंनिध १३

आलें जैं नवरात्र, भूपयुवती तैं खेळती मंडळें,
भूपें, ज्ञात न त्यास, त्यांत असलें स्त्रीरत्न तों देखिलें,
काया गौर, कुमारिका, सकळही रेखीव अंगें जिचीं,
ऐसी पाहुनि रम्य मूर्ति, हृदयीं वांच्छा धरी तो तिची १४

होती ती परि कालिका नृपजनीं रूपें अशा पातली,
क्रीडा ती सरतां, स्वमंदिरपथा ती आक्रमूं लागली,
मागें जाय तिच्या नृपाल, वघतां त्यातें, म्हणे कालिका,
'भूपा! काय हवें तुला? वद.' 'तुझें सौंदर्य दे कामुका' १५

'कांहीं माग दुजें,' असें मग तया बोले भवानी पुनः,
'त्वन्मूर्तीहुनि अन्य गोष्ट,' वदला, 'येई न माझ्या मना,'
रागावे बहु कालिका, मग वदे, 'मेल्या! अजूनी पहा
'कांहीं मागुनि अन्य,' भूप भणला, 'दे त्वत्तनू, हेतु हा' १६

तेव्हां ती खवळे, तिला नृप बळें झाला धराया पुढें,
' मत्तृष्णा शमल्याविना न तुजला देईन जाऊं गडे!
' मी राणी तुजला करीन, पुरवीं मत्कामना सत्वर,
' जाळी शंकर काम, तो मज,' वदे भावीहि कामातुर १७

काळी लालचि जाहली परिसतां तीं कामुकाचीं वचें,
कामांधा रतिवांचुनी इतर ना कांहीं दिसे, ना रुचे,
काळी कोण कडाडली, 'वघ जडा ! ही स्त्री असे कोणती,
'दुष्टा ! कष्टविशी मला, तरिच हो तूं स्पष्ट नष्टस्थिति' १८

ऐसें गर्जुनि, ती भयानक अशा रूपास अंगीकरी,
तें पाहूनि चपापला नृप, जसा देखूनि सिंहा करी,
वज्रें इंद्र विदारितां अग जसा होई प्रचंड ध्वनि,
तद्वद्घोष, दुभंग अद्रि, नृपहृद्भंग प्रभो ! तत्क्षणीं १९

अंतर्धानचि व्हावया त्वरित घे खांचेंत देवी उडी,
लागे तोंच बसावयास गिरिची, आकंठ जों ती, घडी,
जाणे एक विभूच, केविं समयीं त्या तत्स्थळा पावतो,
हिंदू दैवत रक्षण्या, सदनशा हें नाम ज्या, पीर तो ! २०

गेलें आंत धड, क्षणांत शिरही होईल अंतर्हित,
तों येऊनि समीप तो सदनशा केशीं तिला ओढित,
देवीचें निमिषांत एक मुख तें पैं अश्मता पावलें,
आहे तत्स्थितिमाजि आजिवरि तें पावागडीं राहिलें २१

केला यत्न जयें, धरूनि कच ते, काढावयातें तिला,
दुर्दैवा ! वघ तो तिच्या सदनशा डोक्यावरी बैसला !

शोभालोकमिषें शिरावरि तिच्या तूंही उभा प्रेक्षका !
म्लेच्छाच्या परि त्या शिरावरि अरे ! तूं पाय देशील का? २२

प्रासादाप्रति जाय तो जडपदें राजा, म्हणे अंतरीं,
' देवीचा मज शाप, काय लटिका होईल तो ? ' यापरी,
मोत्यांचा करवूनि चूर निकटीं टाकीं तडागीं नृप,
घे तें दुग्धतडाग नाम, शुचिही आहे पहा तत्क्षप २३

हें कासार लहानसें असुनियां अत्युच्च भागीं असे,
त्याची शीतलता किती ! हुडहुडी स्नानें तयीं येतसे,
आहे खोल बरेंच तें, तदुदका कीं दुग्धतुल्या रुची,
वाटे स्नान करावया निजगजा यामाजिं धाडी शची २४

दुर्गाचे तट भूप भग्न करवी, तोफा तशा तोडवी,
प्रासादा लुटवी, अनंतर तया हस्तें स्वतः पेटवी,
' प्रत्यक्ष प्रमुला चुके न करणें वाल्मीकिशब्दांपरी,
' मी तों पामर, सत्य शब्द तव गे माते ! पहा मी करीं' २५

भूपें यापरि आपुला करविला नाश स्वहस्तें अहो !
चांपानेर पुरीही पार पडली तीं नाथभागा सहो,
स्पर्धा जें अभिधेंत मात्र करितें, खेडें उभें तें परी,
तैसें द्वार पहा वटोदरपुरीं, नांवा तिच्या जें धरी. २६

आहे, यज्जल तैलवत्, सर असें या अद्रिपृष्ठीं दुजें,
आहे दुग्धसराहुनी गुरु, परी खालील बाजूस जें,
नामें तैलतडाग, जें पसरतें गुर्वापगेसारखें,
कांहीं दाखविती तदंबुमधुनी लोकां शिला स्वें मुखें. २७

कालीची भगिनी निवास करिते ती भद्रकाळी तशी,
जाण्याचा तिकडे अरुंद पथही, गांठी पडे भीतिशीं,
दोहों बाजुंस खोल खोल नुसतें, डोळे फिरूं लागती,
देवीदर्शन दूर, काळ जवळी, होईल कैसी गति? २८

जातां अद्रिसमीप सान दिसतो, त्याची न ये कल्पना,
होई यान जसेंजसें वरिवरी, चांचल्य येई मना,
येती पाय दुखूनि, चर्र हृदयीं होतें कडे पाहुनी,
तैसें खोल दरी विलोकुनि, तथा टाकूनि दृष्टी वनीं. २९

शार्दूलादिक उग्र हिंस्रपशुही येथें वनीं नांदती,
झाडी किर्र, शिला विशाल, भरिती चित्तींच भीतिप्रति,
धांवाधांव करीत मेघ फिरती ते भूधराभोंवतीं,
तैसे वृष्टिमिषें, प्रमोद घडतां क्रीडेमुळें, हांसती ३०

कोठें पाद पथीं पहा निसटतो, शेवाळ जेथें अशा,
देवीला सहजीं नमस्कृति घडे, मित्रीं पिके तों हंशा.

कोठें तों इकडूनियांहि तिकडे घ्याव्या उडया लागती,
तेव्हांही मनुजातपूर्वज तदा स्वीया करूनि स्मृति　　३१
आश्चर्यें शिखरावरूनि गिरिच्या चोहींकडे पाहतां,
सृष्टी सर्व दिसे खुजी, गिरिपुढें झाली जणों ती नता,
पृथ्वी दूर गमे, समीप नभ, दे चित्तांत टाणें भय,
कीं आकस्मिक पात हो, न घडणें या जीविताची गय ३२
हीं का अद्रिशिरें ? न, भूस्तनाचि, जे देती नभातें पया,
हीं कैचीं हिरवीं वनें ? वसन हें झांकी जयें ती तयां,
हे तों मेघ न, दुग्धचिह्नचि असे आकाशबालाननीं,
हे कासार न, दुग्ध-ओघळ तिचे येती पहा वाहुनी　३३
टाकी तो ग्रहराज आत्मकर या पीनीं धरित्रीस्तनीं,
या नाहींत दरी, क्षतें तरणिनें केलीं नखें टोंचुनी,
कैचें अंबर हें ? विशालवपु कीं ही राक्षसी पूतना,
भूभृत् हा नच, होय कृष्ण, करितो जो तत्पयःशोषणा ३४
हा का अद्रि ? नव्हेचि, शिल्पकृति ही श्रीविश्वकर्मा करी,
कां होईल न दंग बुद्धि, बघतां ती, मानवाची तरी ?
वाटे मूर्त असें भयानकरसें हें घेतलें रूप वा,
मोठे तो रस वार्णिते कवि जना दावींत तल्लाघवा　　३५

आतां प्रेक्षक याजला तुडविती, ऐश्वर्य गेलें लया,
ज्याचें वैभव नाश पावत असे, कोणी गणीना तया,
वाटो क्षुद्र परास, पात्र नुतिला किंवा न वाटो धड,
लोकीं **वाड** असाचि नित्य **अग** हा **पाहीन पावागड** ३६

---

# ' थांबवा न, तिज आज रडूं द्या—'

स्वागता.

" थांबवा न, तिज आज रडूं द्या—
हाय ! होरपळली वणव्यानें !
दाटलें हृदयदुःख पडूं द्या
कीं बहिः नयनयुग्मपथानें १
" कोण सांत्वन तिचें करणार ?
काय शक्य करण्यास असे तें ?

ढोंग आजवरि तें अयि ! फार
माझियाहि दिसलें नयनांतें २

" लोपली सुभगताच तियेची,
कोण तीस मिळवूनि तिला दे ?
मूर्ति आज तिचिया हृदयाची
भंगली अहह ! अंतकपादें ! ३

" दुःख हृद्गत अतीव यदीय,
त्याजलाच कळतें, न परास,
सांत्वनेंच लटिक्या मग हाय !
कां तिचा करितसां उपहास ? ४

" शक्ति होय तुमची मिळवून
द्यावयास तिज तद्धृदयेश ?
कां तुम्ही मग तियेस ' गतं न
* शोचयेत् ' करितसां उपदेश ? ५

" ज्ञान मात्र असतें कथण्याला,
कार्य सर्व करिती कथनाचें,
काय दुर्बल अशा मनुजाला
होय तेज दुसरें करण्याचें ? ६

" दूर व्हा ! तिज यथेच्छ करूं द्या
अश्रुमोचन, न आडविणें तें,
रोदनें हृदय शांत पडूं द्या,
सांगणें बहु अनंतर तीतें ७

" ये भरूनिच वियद्वनितेचें
जेधवां हृदय हो ! कनवाळू,
तारका करिति सांत्वन तीचें ?
देति अश्रु तिजला परि गाळूं ८

" आणि काय म्हटलेंच नसे हें ?–
' क्षोभतां विपुल शोक, रडावें,
वाट ती हृदयशांतिस आहे, '
सांत्वनीं मग कशास यतावें ? ९

" एकटीस तिज सोडुनि जा, जा,
सांत्वनें अधिक दुःखित होते,
आठवील हृदयीं निज राजा,
आणि–आणि–न मला वदवे तें.... १०

" या अजूनि बसलांतच ठायीं ?
यावरी जरि बसाल–बसाल–

सांगतेंच, परिसा तरि बाई !
मृत्युच्या तिज मुखांत पहाल !.... ११
" काय ? येथुनि तुम्ही सरणार
एक पाद न विलज्जपणानें ?
हा खुळा हठ तुम्ही धरणार ?
बाल हा ! तिज मरूं न सुखानें ! १२
" जा, टळा ! तिज अतःपर अंतीं
त्रास द्या न, कर जोडितसें मी....
पातलांत, गमतें, यमदूती
न्यावयास तिजला निजधामीं.... १३
" गे ! कपाळ फुटलें तव आधीं,
त्यांत या उठवितात हिडिंबा,
साहवे न तुजला निज आधि,
त्यांत घालिति अये ! बघ बिब्बा १४
" व्यर्थ सर्व मम यत्न जहाले,
डाकिणी न सरती परि या हा !
दे मला दृढ मिठी प्रिय बाले ! "
हा....हहा....हहहहा....हह....हा..हा.. १५

# खाडिलकरांस--

विबुधप्रिया.

ऐकतां तव गीतकें, मन होय मोहित सत्वर,
राहतों, गमतें, न भूवरि, वायुच्या लहरींवर,
व्यापितो विपलांत केवल एक नंदन अंतर,
लास तच्चरणांवरी रसना करीहि अनंतर १

जल्पितें कवि ते करोत यथेष्ट संतत यापरी,
'माधुरी कवनींच केवळ आमच्या वसते खरी,'
काव्य सुंदर दे मना कविचें प्रमोद जरी खरें,
त्याजहूनि विशेष ती तव गीतिका हृदयीं भरे २

गायनास्तव सांठवूनाचि ठेविली तव गीतकीं
मंजुता अह ! मानवी अखिला स्वरामधलीच कीं !

कोकिलादिखगारवीं असतीच तीं भरलीं जणूं,
त्यामुळें बहु माधुरी वसते तयांत असें म्हणूं ?

सेवितां पदमौक्तिकें रुचिरागयुक्त तुझीं अशीं,
राजहंस अहा ! पहा विहरे कसा जनमानसीं !
त्वत्पदें मधु गाय तो निजसुस्वरेंच तदा गमे,
धांवतीलहि भूकडे सुर देवगायनविभ्रमें

ऐकलींहि पुनःपुनः तरि मानसा नच वीट ये,
तीं फिरूनिच ऐकतां परि वाटती अधिकें प्रियें,
सारख्या उपभोगिल्या तव गीतिका कळलें तधीं,
सेवितां रस नित्य ये अमरांस वीट न कां कधीं



# १—वर्षाकाल—

वियतिं मेघ दिसती,

अम्हांसी, वियतिं मेघ दिसती,

हे रामबाण जणुं विंध्यरावणा ठार मारिताती ॥ध्रु०॥

क्षणीं क्षणीं येती,

मेघ हे क्षणीं क्षणीं येती,

हें अस्त्र जलाचें कुणी सोडिती तप्त जगावरतीं.

घननीळ जणूं कीं मयुरादिक हर्षवी,

हा प्राणवायु कीं कृषिवल संतोषवी,

घर्षणें जणूं कीं ईश्वर मुखिं नर्तवी,

कल्याणच पुढती,

शक्य तें, कल्याणच पुढती,

हा ईश्वरप्रेषित दूत जसा कीं दिसे जगावरतीं ॥१॥

सर सर सरि येती,

पुढति कीं, सर सर सरि येती,

ह्या अमृतधारा जणूं ओपितो ईश्वर भूवरतीं.

झणीं झणीं भिजते,
मृत्तिका झणीं झणीं भिजते,
जणुं प्रियकरसंगें मृदू होउनी हृदय शांतवीते.
दुंदुभी जणूं कीं शांतविण्या वाजते,
रणवाद्य जणूं कीं उत्साहा देइ तें,
मृदुवाद्य असें तें आनंदा फुलवितें,
वर्षाकाल किती !
अहाहा ! वर्षाकाल किती !
जणुं ईश्वरप्रतिमा सकल खुलविण्या आलि धरेवरती ॥२॥
उत्साहाची मिती,
होइ मग, उत्साहाची मिती,
हे कृषिवल घेउनि हातिं नांगरां जगा फळें देती.
नवजीवन जणुं कीं दिधलें क्षण भासतें,
अंबुजाप्रती तें स्थान तदा लाभतें,
सुखनिद्रा घेउनि हिरवळ फोंफावते,
स्थित्यंतर हें अती,
जगाचें, स्थित्यंतर हें अती,
हे कविजन त्यातें खुलें देखुनी जगास रमवीती ॥ ३ ॥

---

# २ घारसि—



होइं मम आशा ।
वाहिं या दिव्य संदेशा ॥
स्वातंत्र्याची खेळगडिण तूं ।
वैराग्याची मूर्ति असासि तूं ।
दासत्वातें लाथाडिसि तूं ।
ठेवितों आशा ।
वाहिं या दिव्य संदेशा ॥ १ ॥

असासि चाहती सत्प्रीतीची ।
विद्युद्वेगें स्वर्गिं विहरसी ।
जणूं शृंखला स्वर्गधरेची ।
जाशि त्या देशा ।
वाहिं या दिव्य संदेशा ॥ २ ॥

स्वातंत्र्याची हौस फेडसी ।
कैशी बघसी दासबंधुंसी ।
डोळे मिटुनी कां उगि असरसी ।

तोडवीं पाशा ।
वाहिं या दिव्य संदेशा ॥ ३ ॥

अवघड भारी शक्ति मानवी ।
आम्हांला ती कैदी बनवी ।
दैवी शक्तिस अम्हां भेटवी ।
टाळि या नाशा ।
वाहिं या दिव्य संदेशा ॥ ४ ॥

अश्रु ढाळिसी विनास्वार्थ तूं ।
अश्रु ढाळवीं वनमालिसि तूं ।
स्वातंत्र्याच्या वरा घेइं तूं ।
येइं या देशा ।
वाहिं या दिव्य संदेशा ॥ ५ ॥

तोडविं अमुची दास्यशृंखला ।
' मुक्त करीन ' भरंवसा असला ।
केव्हां देशिल या दासाला ? ।
नमुं त्या ईशा ।
घारि ! तूं वाहिं संदेशा ॥ ६ ॥

———

# ३—सौख्यकल्पना—

तनु ही फुलली ।
आनंदीं मग्नाचि झाली ॥ ध्रु० ॥
उपवन जणुं हें नभ कीं भासे ।
वृक्ष मेघ ते सुंदर तैसे ।
तारासुमनां बहर येतसे ।
घडि ही असली ।
रमविती मला ती झाली ॥ १ ॥
बहु त्या दिसती ।
तारका चकाकत वियतीं ॥
परी एक ती मोदरसाचे ।
जणूं ओपिते थेंब सुखाचे ।
मम जीवन ती खुलवी साचें ।
कळि मम उलली ।
रमविती मला ती झाली ॥ २ ॥
जणूं ती वदते ।

लुकलुकुनी क्षण ती मातें ॥
जगतीं केवळ सुख हें नसतें ।
दुःखनिराशा अंतीं उरतें ।
प्रेम जगाचें ध्येयहि नसतें ।
तारा हंसली ।
हिणविती मला ती झाली ॥ ३ ॥
फिकि मग पडली ।
हर्षकळी नच ती उरली ॥
स्त्री भ्यालेली जणुं ती दिसली ।
घडी सुखाची क्षण ती टिकली ।
सौख्यकल्पना मजला दिधली ।
पूर्ण विराली ।
दुखविती मला ती झाली ॥ ४ ॥



# ४—चंद्रमा—



जणुं मावळला,
चंद्रमा कुठेंसा गेला ? ॥ ध्रु० ॥

आंगण ओकें जसें भासतें,
तुळस नसावी जेव्हां तेथें,
तसें मला जग शुष्क भासतें,
जीव हा शिणला ॥ १ ॥

चहुं बाजूंला दृष्टी फिरते,
परी काय तें नजरीं पडतें,
दिव्य कलश परि अमृत नसतें,
ठाव तो नुरला ॥ २ ॥

मेघ फिरतसे इकडुन तिकडे,
तेज दाविण्या मोहक अपुलें,
चमकत शंपा नसल्या, झालें !
फिका तो पडला ॥ ३ ॥

मंचक देवा ! हृदय बनविलें,
आसन देण्या उभें टाकलें,
रिक्त तेथवां मला उमगलें,
ठार जिव झाला ॥ ४ ॥

सरोवरीं तें अंबुज फुललें,
गुंजन करिती भ्रमर तेथले,
कमलशोभिनी नसतां कळलें
मोद रे ! कसला ? ॥ ५ ॥

ईश्वरें असे मजला दिधलें
शरीर सुंदर दिव्याचि असलें,
परी चोरितो आत्मा, सरलें !
नाश अजि झाला ॥ ६ ॥

---

## ५ स्वप्नमोहिनी.

हास्य सुखाचें खरें ।
तुझें हें हास्य सुखाचें खरें, ।

हें सांग लाडके! तुझ्याकारणें मानव कोण झुरे ? ॥
क्षणाक्षणाचें हंसें ।
तुझें हें क्षणाक्षणाचें हंसें ।
प्रतिबिम्ब तुला जणुं मला वाटतें स्वप्नीं एक दिसे ॥
तूं भिंग जणूं कीं करिसी हृदया तुझे ।
तूं मूर्ति प्रियाची धरिसी त्याचे पुढें ।
मृदु ओष्ठांवरतीं लाली क्षणिं दिसतसे ।
हंससी कां तूं असें ? ।
सांग गे ! हंससी कां तूं असें ? ।
तूं स्वप्निं नसोनी प्रियासंगतीं गुंग झालिसें दिसें ॥ ३॥
वृत्ति गुंग करिसी ।
अशी मम वृत्ति गुंग करिसी ।
तूं जणूं पुष्प, मी भ्रमर, येतसे हें माझ्या मानसीं ॥
जणुं कलश सुधेचा जवळी माझ्या वसे ।
वृक्षास पुष्प कीं आलें नव हें दिसे ।
मोहिनी जणूं मज मोहीं घालीतसे ।
पुष्प असासि तूं खरें ।
मधुर मम पुष्प असासि तूं खरें ।
हें जीवन माझें, खरें सांगतों, तुझ्यांत मात्र उरे ॥२॥

दचकुन कां हलसी ।
प्रेमळे ! दचकुन कां हलसी ।
जणुं वाटे मजला निशावसानें उषेसमा भ्याडसी ॥
राधिका जणूं तूं मुरलीधर पाहसी ।
तेधवां सुखें तूं प्रेमार्णविं पोहसी ।
तूं अपुल्या, गमतें, साक्ष जिवा टेविसी ।
कळतें सर्व तुला ।
सुंदरी, कळतें सर्व तुला ।
मग रहस्य पुढचें तुला सांगण्या काय काज मजला ?

---

# ८ आर्तसूर.



तूं खुडसी कां रे ! माझ्या अजि या फुला ?
या वास जरी कीं जगतिं नसे चांगला,
परि अधिक तोचि मीं श्वासाहुनि मानिला,
हें कथण्या तुजला भीति मुळीं नच मला.

हें खडकावरि रे ! जगतिं जरी फूललें,
त्या खडकांना मीं गिरद्यासम लेखिलें.
हें आहे धागाबांधा माझ्या जिवा,
तो तोडुनि करिसी तनूवेगळें जिवा.
हा अश्रुपूर रे ! लोटूं किति माधवा !
मम रंग मनाचे खिलती यांतच पहा;
हें ऐश्वर्याचें स्थानच जगतीं अहा !
हें आवडतें मम पुष्प शोभवी धरा.
तूं कलिकाळाच्या सजाविसि कां बा ! करा ?
माधवा ! देववीं पुष्पाचि माझें मला,
मम आर्तसूर हा रिझवितसे का तुला ?
शेषावरि घेसी झोंप सुखें तूं भला,
हा टाकी नेउनि दुःखगृहीं परि मला !
रे ! कुठें कुठें तूं नेसी माझ्या फुला ?
तूं दिससि पारखा मातृप्रेमा मला.
मम हंबरडा कां तुज रे ! नच झोंबला ?
तूं कुठें कुठें रे ! जासी माझ्या फुला ?
हे दुःखी सुमना नजर कुठें टाकिसी ?
तव दुःखानें तूं आज मला जाळिसी.

मृदु पाकळ्या तुझे ओष्ठ खचित वाळले.
सोडिते तुला हे भृंग पहा जाहले.
स्वर्गी मम येणें कधीं जाउनी पुढती
लाडक्या ! खचित मी येइन तुजमागुती

— — —

# ७ मुरली.

वेईं त्वदीय मुरली
वाजीव रे मुरारी ! ॥ ध्रु० ॥
मुरलीचिया निनादें
रंगीव जीव मोदें,
धेनू जशा रवानें
येतात भावनेनें
ठाकोनि मध्यभागीं
आणीव एक जागीं,
सेवोनि प्रेम हृदया
उपदेश दे जना या,

दुःखास दूर सारीं
गावोनि तूं मुरारी ! ॥ १ ॥

राधेसि कोण रमवी ?
तल्लीन वृत्ति बनवी,
त्वन्मार्ग तीच घेई
विसरोनि सर्व कांहीं,
तल्लीन तेविं बनवीं
आम्हांस मार्ग दावीं,
तूझ्या कृपेविणें रे !
हतवीर्य आज सारे,
धावोनि येइं वेगें,
बुडता करास मागे ॥ २ ॥

कंसास मारिलें तूं
जाणोनि दुष्ट हेतु,
सर्पा तशाच काळ्या
देण्यास सौख्य सगळ्यां,
तैशीच बुद्धि देईं
आम्हांस तूं मुरारी !

दिसण्यांत कंस भारी
ऐसे अम्हांस वैरी,
अनिवार मोह यांचा
गळफांस देहिं साचा,
अज्ञान दूर सारीं
गाऊनि तूं मुरारी ! ॥ ३ ॥

---

## ८ कोकिलेस—

तूं गाइ सदा कोकिले !
गानानें तूं सकल रंजवीं जगताचीं हीं मुलें ॥ ध्रु० ॥
गानाच्या तव लकेरलहरी उठल्या या तरुवरी,
त्या लकेरलहरी अम्हांस नेती आनंदाच्या भरीं,
स्वर्गिं देव त्या ऐकुनि डोलति, पुष्प जसें तरुवरी,
करुं नको गान किलकिलें ॥ १ ॥
मंजुरवाच्या मौक्तिक—माला अर्पिसि आम्हांप्रति,
जाणिव आम्हां होय सर्वदा अशी तुझी उपकृति,

दैविशक्तिमूर्ति तूं, तुजपुढें मानव आम्ही किती !
हें जगें असें लेखिलें ॥ २ ॥

फुलती हिरवळ, उमलति पुष्पें वाट तुझी पाहती,
मुसमुसली ही धरा लेउनी सौंदर्याची कृती,
तरुवर आसन खुलें देखुनी ढाळिति अश्रू किती !
पाहिजे गान ओपिलें ॥ ३ ॥

हीं गुलाब-पुष्पें धरा धारिते गुलाब-गालांपरी,
कारंजा जणुं त्यांवरि नाचे बंसी घेउनि करीं,
न्यून जणूं तव धरेस कथितो प्रेम धरुनि अंतरीं,
झणिं हृदया कर गे ! खुलें ॥ ४ ॥

आनंदाची बाग फुलालि ही प्रेम भरुनि मानसीं,
उल्हासाचीं फुलें विकसलीं नानारंगें तशीं,
मंजुसुराचीं उडति पांखरें गुंग होउनी कशीं,
त्यां बहर हवा कोकिळे ! ॥ ५ ॥

सृष्टिदेविचा हिरवा शालू पहा कसा शोभतो,
सुगंध त्याचा गोड असा तव वाट जणूं पाहतो,
उटणें लाउनि तुला खुलविण्या बघे, कोण जाणतो ?
हें तुला तुझें गे ! कळे ॥ ६ ॥

हो शांतघडीची नौका वाही वायुसागरावरी,
पक्षीगण जणुं आंत बैसला शांत, न कांहीं करी,
वल्हविण्या कुणि हवा सोबती मानस ऐसा धरी,
ये वल्हविं तूं कोकिले ! ॥ ७ ॥

प्रभातवनिता शांतप्रभेचें शुभ्र वस्त्र ल्याली,
ती हळुहळु गाळी अश्रु कोकिले ! भीत फार झाली,
सौख्याचें जणुं राज्य संपल्या सचिंत ती झाली,
ये, तोषविं तूं कोकिले ! ॥ ८ ॥

झरा वाहुनी, विसर पाडण्या, प्रयत्न नाना करी,
झुळ झुळ वाहे मधुरध्वनीनें, मोहिनि नाहीं परी,
पितळ चमकतें सोन्याचेपरि, सोनें होइ न तरी,
जग मोहिनिला भूललें ॥ ९ ॥

हीं हरित तरूंचीं झुलती शिखरें खेळीं मोदें भलीं,
पवन संवगडी चुकवुनि त्यांना सळकन् घे उसळी,
काळ मजेचा दवडुं नको गे ! झाडें बघ भागलीं,
त्यां हुषारि दे कोकिले ! ॥ १० ।

विहगध्वनीचे पैंजण बांधुनि नाचत आली उषा,
हंसत येउनी सकलां हांसवि शिंपुनि मोदरसा,

स्वागत नसल्या म्लान होइ ती जणूं भासते निशा,
तुज योग्य कसें वाटलें ? ॥ ११ ॥

सहस्ररश्मी पहा गडे गे ! अजुनी सुप्ताचि असे,
गोड ध्वनीनें हलवुनि त्यातें जागविं लवकर कसें,
चदत सुरानें उदयगिरीचे मार्ग दाविं त्या तसे,
हें कार्य असे तुज दिलें ॥ १२ ॥

कारंजा हा थै थै नाचुनि हांसत स्वागत करी,
मयूरास या संभ्रम पडला कोण नर्तना करी,
सकल सृष्टिही नर्तनिं डोले आनंदाच्या भरीं,
सुख–पूर जणूं लोटले ॥ १३ ॥

कारंजा तो अर्पिण्यास तुज माला गुंफितसे,
तूं लवकर येशिल म्हणुनि घाबरे, कार्या लागतसे,
जलमौक्तिक हे अखिलहि गळती माला नच होतसे,
ये झटकन् तूं कोकिले ! ॥ १४ ॥

मुकुलमालिका स्वतंत्रतेच्या मार्गालागीं वरी,
हंसरी बाला खुदकन् हांसुनि पुष्पितरूपा धरी,
आनंदाची वृत्ति प्रमोदा सहजचि द्विगुणित करी,
तूं लेई ती कोकिले ! ॥ १५ ॥

कमल कुमुदिनी प्रफुल्ल असतां मलूल दिसती तरी,
वाद लागला दोघांमध्यें सुराज्य कोणाकरीं,
मधुरव करुनी भ्रमर कथितसे सत्ता माझी खरी,
तव राज्य कसें संपलें ? ॥ १६ ॥

तव सुराज्य गेलें लया म्हणोनी बेकी बघ माजली,
फुलझाडें हीं वायूवेगें विस्कलीत जाहलीं,
गोड सुराचें राज्य संपल्या भीषणता पसरली,
घे सूत्रें तूं कोकिले ! ॥ १७ ॥

शिशिर ऋतूंतिल तरू भागती शोधुनि तुजला अती,
ते रागानें जणूं आपले पल्लव भिरकाविती,
स्वरूप तैसें नसे राहिलें, सुंदर झालें अती,
वन हें फोफावलें ॥ १८ ॥

गौंजेसाठीं येति बालिका पुष्पवाटिकांतरीं,
त्या हृदयींचीं पुष्पें कोमल उधळिति नानापरी,
मंजु सुरांची कुजबुज त्यांची भुलवि न तुजला परी,
त्या सृष्टिदेवता, खुळे ! ॥ १९ ॥

तूं क्षुद्र असासि का ? बांधवविरहें कुठें लपुनि बैससी,
बांधव बघ तव चंचु खोलुनी आळविती तूजशी,

बाजविती तव आगमनार्थी कांहीं वाद्यें तशीं,
वन मंजुसुरें व्यापिलें ॥ २० ॥

कां कोण कोठुनी हाक मारिते भ्रांती याची तुंतें,
कर्तव्याची जाणिव होतां अधिक तसें भासतें,
ही सृष्टिदेविची केविलवाणी हाक बोलवी तुंतें,
ये धांव धांव गे ! भले ॥ २१ ॥

कां जाब देसि तूं सृष्टीपुढती उशिर जाहल्यामुळें,
हृदय तिचें गे ! पुष्प शोभतें, आहे त्यापरि खुलें,
बालचुकीची क्षमा करील न असें वाटतें खुळे !
तुज वेड कसें लागलें ॥ २२ ॥

कां स्वप्निं रंगली गोड सुखाच्या, भान असे हरपलें,
वसंतघडिचें स्वप्न सुखाचें होइल तव हें भलें !
बुडबुडा सुखाचा क्षणांत विरतो, काळ न घे हें खुलें,
हें तुला कसें नच कळे ? ॥ २३ ॥

तूं सृष्टिदेविचें बालक अससी, जननी साची तुझी,
चुकल्यासम गे ! तुला भासतें हुरहुर वाटे अजी,
सान बालका ! तुला चुंबण्या उत्सुक माता तुझी,
तं गमन कसें चुकविलें ? ॥ २४ ॥

तूं सृष्टिदेविचें रूप देखुनी येत नससि का भयें,
मंजुसुराचा गोड दागिना लेइं तसा तूं स्वयें,
चमक तयाची फिकें पाडितें रूप देविचें अये !
शंकेसि सोड गे! भले ॥ २५ ।

अश्रुपूर्ण हें पर्ण विव्हळे हलुनी आपण कसें,
माता याची तुज बोलावुनि तत्कारण कथितसे,
दुज्या दुखवुनी स्वयें रंजणें न्याय खरा का असे ?
बहु दुःखें हें जाचलें ॥ २६॥

आयुष्याचे क्षण हे जैसे पाचु हिरे भूवरी,
उचलुनि घ्यावे जगें श्रमानें शक्य असे तोंवरी,
हिरा क्षणाचा हारवितां तो येना कोणाकरीं,
तूं पाचू बघ सांडले ॥ २७ ॥



हें पुस्तक बडोदें येथें "**श्रीरामविजय**" छापखान्यांत रा. **धों**
**नारायण विद्वांस**, यांनीं छापिलें व विठ्ठलराव मल्हार
गायकवाड, यांनीं येथेंच प्रसिद्ध केलें. १७—६—३२